जागतिक कृषि गणना योजना
(२४०१ ०९९६) योजनेसाठी सन २०१९-२०
मध्ये निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृगयो -२०१९/प्र.क्र.११४ /११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
तारीख: १६ जानेवारी, २०२०

संदर्भ: -

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.०८.०७.२०१९
२. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. कृगयो -२०१९/प्र.क्र.११४/११-अे, दि.२.८.२०१९
३. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०१९/प्र.क्र.३८/११-अे, दि.१९.१०.२०१९
४. शासन निर्णय, कृषि व पदूम विभाग क्र. कृगयो -२०१९/प्र.क्र.११४/११-अे, दि.२८.११.२०१९
५. भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र क्र. ११०१४- १ /२०१९/ACU, दि.१३.१२.२०१९
६. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ / कृ.ग. / अनुदान /बीडीएस /प्र.क्र. २ / २०१९-२०/ १०३५८ /२०१९, दि.२६.१२.२०१९
७. शासन शुध्दीपत्रक, कृषि व पदूम विभाग क्र. कृगयो -२०१९/प्र.क्र.११४/११-अे, दि.१६.०१.२०२०.

**प्रस्तावना :-**

जागतिक कृषि गणना योजना या योजनेकरिता, केंद्र शासनाने, सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्याकरिता दिनांक ८.५.२०१९ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. त्यानुसार राज्य शासनाने जागतिक कृषि गणना योजना या योजनेकरीता संदर्भ क्र. (२) च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

२. जागतिक कृषि गणना योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेतील २२ अस्थायी पदे दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ ते २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र. (३) च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

३. जागतिक कृषि गणना योजना ही योजना १०० टक्के केंद्र पुरस्कृत असून केंद्र शासनाकडून दि.१६.१०.२०१९ रोजीच्या पत्रान्वये सदर योजनेसाठी सन २०१९-२० या वर्षासाठी पहिला हप्ता रु.१६४.१९ लाख प्राप्त झालेला आहे. अनुषंगाने कृषि आयुक्तालयाच्या प्रस्तावानुसार जागतिक कृषि गणना योजना या योजनेसाठी पहिल्या हप्ता रु.१५५.४४ लाख इतका निधी संदर्भ क्र. (४) व (७) येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. (५) येथील पत्रान्वये सदर योजनेसाठीच्या निधीचे पुर्नवितरण करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने कृषि

आयुक्तालयाच्या संदर्भ क्र. (६) येथील प्रस्तावानुसार जागतिक कृषि गणना योजना या योजनेसाठी पहिल्या हप्त्यासाठी "५०- इतर खर्च" या बाबीखाली रु. ८.७५ लाख इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जागतिक कृषि गणना योजना ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत असून या योजनेकरिता सन २०१९-२० साठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या पहिल्या हप्त्यासाठी "५०- इतर खर्च" या बाबीखाली रु.८.७५ लाख इतकी रक्कम वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा -

**मागणी क्र. डी-३**
**२४०१ पिक संवर्धन**
**१११- कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी**
**१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना**
**(०१) (१०) जागतिक कृषि गणना, (२४०१ ०९९६)**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- ५ यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११६१४५९३८१३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Neeta Eknath Shinde

Digitally signed by Neeta Eknath Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f2bffd6992498e56663024368c72b33364cfb066d53682c53a425e54d187a7c1, serialNumber=f325d659f47933958aa2d98f394db95f94be57548776492ba36e77ea1c4aa53b, cn=Neeta Eknath Shinde
Date: 2020.01.16 15:00:24 +05'30'

**( निता शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
५. कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५

७. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
८. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
९. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१०.संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
११.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२.वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३.नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४.उप सचिव (११-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१५.कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१६. निवड नस्ती, का.११-अे.